राज्यातील जिल्ह्यांमध्ये जिल्हा पशुकल्याण समिती व राज्य पशुकल्याण समन्वय समिती स्थापन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-केंपुयो-२०२४/प्र.क्र.१७/पदुम-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २९ जुलै, २०२४.

**वाचा :-** १. केंद्र शासनाच्या पशुसंवर्धन विभागाच्या सचिव यांनी सचिव (पदु) यांना लिहीलेले अ.शा. पत्र क्र D.O. No. K-११०५३/९९/२०२३-LH (E-२५४९६) दि. १५.०३.२०२४
२. आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र. एफवायपी-२३ (२४)/तां- १ /सीआर- ५४/११८८/२०२३,पसं-६,पुणे, दि.०५.०५.२०२४

**प्रस्तावना :-**

कृषि व्यवसायापासून मिळणाऱ्या एकूण राष्ट्रीय सकल उत्पन्नाच्या २६ टक्के व देशाच्या एकूण राष्ट्रीय सकल उत्पन्नाच्या ४.११ टक्के वाटा पशुपालन व्यवसायाचा आहे. पशुपालन व्यवसाय या घटकामध्ये उत्पन्न वाढविण्याच्या दृष्टिने अधिक क्षमता असून सदर क्षमतेचा पुरेपुर वापर होत नाही. यामागची प्रमुख कारणमिमांसा पशुधनाच्या आरोग्याकडे होत असलेले दुर्लक्ष हे आहे. पशुधनाची पुर्ण उत्पादनक्षमता वापरात आणण्यासाठी पशुधनास आरोग्याच्या सुविधा उपलब्ध व्हाव्यात यासाठी आरोग्य सुविधांमध्ये वाढ करणे व उपलब्ध असलेल्या आरोग्य सुविधांचा प्रभावी वापर करणे क्रमप्राप्त ठरते. या पार्श्वभूमीवर केंद्र शासनाच्या पशुसंवर्धन विभागाने वाचा क्र. ०१ येथील दि. १५.०३.२०२४ रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान (NRHM) अंतर्गत रोगी कल्याण समित्या व मध्यप्रदेश राज्यातील पशुकल्याण समितीच्या धर्तीवर प्रत्येक जिल्ह्यात पशुकल्याण समितीची स्थापना करण्याचे निर्देशित केले आहे. त्यास अनुसरुन राज्यातील प्रत्येक जिल्ह्यात जिल्हा पशुकल्याण समितीची स्थापन करण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

पशुसंवर्धन विभागामार्फत देण्यात येणाऱ्या पशुआरोग्य सुविधांचा प्रभावी वापर करणे, पशुआरोग्य पायाभूत सेवा-सुविधांमध्ये सुधारणा करणे आणि पशुधनातील उत्पादकता वाढविण्याकरिता केंद्र शासनाच्या पशुसंवर्धन विभागाने निर्देशित केल्याप्रमाणे राज्यातील प्रत्येक जिल्ह्यात “जिल्हा पशुकल्याण समिती” व समितीचे कामकाज हाताळण्यासाठी “कार्यकारी मंडळ” च्या संरचनेस तसेच राज्यातील सर्व जिल्हा पशुकल्याण समित्यांच्या कामकाजात सुसुत्रता आणण्यासाठी “राज्य पशुकल्याण समन्वय समिती” गठित करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

## अ) जिल्हा पशुकल्याण समिती

### (१) समितीची संरचना :-

| अ.क्र. | नाव |
|---|---|
| १ | जिल्हाधिकारी |
| २ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद |
| ३ | जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त |
| ४ | जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी |
| ५ | सहायक आयुक्त पशुसंवर्धन, जिल्हा पशुवैद्यकीय सर्वचिकित्सालय |
| ६ | जिल्ह्यातील शासकीय पशुवैद्यकीय संस्थांचे कार्यालय प्रमुख |
| ७ | लोकप्रतिनिधी |
| ८ | जिल्ह्यातील पशुसंवर्धन विषयक सेवाभावी संस्था |
| ९ | पशुपालक |
| १० | शेतकरी |
| ११ | पशुसंवर्धन विषयक उद्योजक |
| १२ | सामान्य उद्योजक |
| १३ | दानशुर पशुप्रेमी |

**(२) समितीची नोंदणी :-** राज्यातील मुंबई शहर व मुंबई उपनगर हे दोन जिल्हे वगळता उर्वरित ३४ जिल्ह्यांमध्ये स्थापन करण्यात येणाऱ्या जिल्हा पशुकल्याण समित्यांची त्यांच्या उपविधीसह "सोसायटी नोंदणी अधिनियम,१८६०" अंतर्गत नोंदणी करण्यात यावी.

**(३) कार्यकारी मंडळ :-** प्रत्येक जिल्ह्यात स्थापन करण्यात येणाऱ्या जिल्हा पशुकल्याण समितीचे दैनंदिन कामकाज चालविण्यासाठी समितीच्या सदस्यांमधून कार्यकारी मंडळ गठित करण्यात यावे. कार्यकारी मंडळाची संरचना खालीलप्रमाणे राहील.

| | | |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | सह-अध्यक्ष |
| ३ | जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी | सदस्य |
| ४ | सहायक आयुक्त पशुसंवर्धन, जिल्हा पशुवैद्यकीय सर्वचिकित्सालय | सदस्य |
| ५ | पशुपालकांचे दोन प्रतिनिधी | सदस्य |
| ६ | जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त | सदस्य सचिव |

### (४) जिल्हा पशुकल्याण समितीची उद्दिष्टे:-

१. पशुआरोग्य सेवा प्रणालीत सुधारणा.
२. पशुसंवर्धन विभाग व इतर संस्थामार्फत देण्यात येणाऱ्या पशुआरोग्य सुविधांची दर्जावाढ व आधुनिकीकरण.

३. सेवाशुल्क, देणग्या आणि इतर माध्यमांद्वारे संसाधने निर्माण करुन त्याचा उपयोग पशु आरोग्य सेवा प्रणाली मजबूत करण्यासाठी वापर.

४. आरोग्य शिबिरांचे आयोजन.

५. पशुवैद्यकीय रुग्णालये सुस्थितीत ठेवण्याच्या अनुषंगाने घ्यावयाच्या विविध निर्णय प्रक्रियेत शेतकरी पशुपालकांना सहभागी करुन घेणे.

**(५) जिल्हा पशुकल्याण समितीची कार्ये :-**

१. केंद्र शासनाच्या भांडवली गुंतवणुकीसाठी राज्यांना विशेष सहाय्य योजनेंतर्गत तसेच इतर योजनेंतर्गत विविध बाबींकरिता केंद्र शासनाचा निधी उपलब्ध होण्याच्या अनुषंगाने प्रस्ताव सादर करणे.

२. पशुवैद्यकीय रुग्णालये कार्येक्षमपणे चालविण्यासाठी आवश्यक उपकरणे, फर्निचर, औषधी पुरवठा करुन आरोग्य सेवांचे दर्जावाढ आणि आधुनिकीकरण करणे.

३. पशुवैद्यकीय रुग्णालयात येणाऱ्या पशुरुग्णांना चारा व पाणी तसेच, पशुपालकांना पिण्याचे पाण्याच्या उपलब्धतेबाबत उपाययोजना करणे.

४. पशुआरोग्य सेवा सुविधा आणि उपचार प्रोटोकॉलच्या किमान मानकांचे पालन सुनिश्चित करणे.

५. पशुरोग निदानाकरिता आवश्यक चाचण्या करून घेण्यास पशुपालकांना आर्थिक व मार्गदर्शनपर सहकार्य करणे.

६. पशुवैद्यकीय रुग्णालय स्वच्छ व सुस्थितीत ठेवण्याच्या अनुषंगाने आर्थिक सहकार्य करणे.

७. पशुआरोग्य सेवांची समाजाप्रती जबाबदारी सुनिश्चित करणे.

८. आरोग्य शिबिरे आयोजित करणे.

९. देणग्या, वापरकर्ता शुल्क इत्यादींद्वारे स्थानिक पातळीवर संसाधने निर्माण करणे.

१०. आधुनिक पशुप्रजनन सुविधा सर्वोतोपरी मिळणेबाबत कामकाज करणे.

११. पशुवैद्यकीय व्यवस्थापनात सुधारणा.

१२. पशुसंवर्धन विषयक कायदे व शासकीय योजना यांची प्रसिद्धी व प्रचार करणे,

१३. पशु-पक्षी कल्याणासाठी कार्यक्रम आयोजित करणे.

१४. रेबीज व इतर प्राणीसंसर्ग रोगांबाबत जन माणसात प्रचार आणि प्रसिद्धी करणे.

१५. इतर शासकीय विभाग यांच्याशी संपर्कात राहून त्यांच्या पशुसंवर्धन विभागाशी संलग्न असणाऱ्या योजनेची अंमलबजावणी करणेविषयक कामकाज करणे.

१६. पशुपालकांच्या समस्या दुर करण्यासाठी प्रयत्न करणे.

१७. पशुचिकित्सालयाच्या दैनंदिन व्यवस्थापनासाठी शाश्वत आणि पर्यावरणपूरक उपाय योजनांचा अवलंब करणे, उदा. वैज्ञानिक रुग्णालयातील कचरा विल्हेवाट प्रणाली, सौर प्रकाश व्यवस्था, सौर रेफ्रिजरेशन प्रणाली. पाणी साठवण आणि पाणी पुनर्भरण प्रणाली इ.

**(६) जिल्हा पशुकल्याण समितीचे आर्थिक स्त्रोत:-**

१. केंद्र शासनाची भांडवली गुंतवणुकीसाठी राज्यांना विशेष सहाय्य योजना, २०२३-२४.

२. समित्यांद्वारे देण्यात येणाऱ्या सेवांचा सेवाशुल्क स्वरूपात मोबदला,

३. लोकप्रतिनिधी, जिल्ह्यातील पशुसंवर्धन विषयक सेवाभावी संस्था, पशुपालक, शेतकरी, पशुसंवर्धन विषयक उद्योजक, दानशुर पशुप्रेमी व सामान्य उद्योजक इत्यादींना आकारण्यात येणारा सदस्यता शुल्क

४. सीएसआर फंड,

५. राष्ट्रीय / आंतरराष्ट्रीय देणगीदारांकडून प्राप्त होणारा निधी.

## ब) राज्य पशुकल्याण समन्वय समिती

**(१) समितीची संरचना :-**

वरील प्रमाणे स्थापन करण्यात येणाऱ्या जिल्हा पशुकल्याण समित्यांच्या कामात सुसुत्रता व समन्वय साधण्यासाठी आयुक्त पशुसंवर्धन यांच्या अध्यक्षतेखाली खालील प्रमाणे “राज्य पशुकल्याण समन्वय समिती” गठित करण्यात येत आहे :

| | | |
|---|---|---|
| १ | आयुक्त पशुसंवर्धन | अध्यक्ष |
| २ | मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, नागपूर | सदस्य |
| ३ | व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे | सदस्य |
| ४ | उपायुक्त पशुसंवर्धन, पशुप्रजनन | सदस्य |
| ५ | उपायुक्त पशुसंवर्धन (पशुधन व कुक्कुट) | सदस्य सचिव |

**(२) राज्य पशुकल्याण समन्वय समितीचे कार्ये :-**

१. राज्यातील प्रत्येक जिल्ह्यात पशुकल्याण समिती स्थापन करण्यासाठी पाठपुरावा व मार्गदर्शन करणे.

२. प्रत्येक जिल्ह्यात स्थापन करण्यात येणाऱ्या पशुकल्याण समितींची संस्था नोंदणी अधिनियमांतर्गत नोंदणी करताना समितीचे दैनंदिन कामकाज चालविण्याच्या दृष्टीने उपविधीची नोंदणी करणे आवश्यक आहे. सर्व जिल्हा पशुकल्याण समित्यांच्या उपविधीमध्ये एकवाक्यता राहावी, यासाठी आदर्श उपविधी (Model Bye laws) तयार करुन सर्व पशुकल्याण समित्यांना देणे.

३. जिल्हा पशुकल्याण समित्यांकडून हाती घेण्यात येणाऱ्या कामे व राज्य / केंद्र शासनाच्या निधीतून हाती घेण्यात येणारी कामे यात व्दिरुक्ती होऊ नये, याची दक्षता घेणे.

४. जिल्हा पशुकल्याण समित्यांच्या शंकाचे / प्रश्नांचे निरसन करणे.

५. पशुकल्याण समित्यांच्या कामाचा आढावा घेण्यासाठी तिमाही आढावा बैठका घेणे.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक सांकेताक २०२४०७२९१४४४५४५५०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने,

NIWRUTTI BHAGUJI MARALE

Digitally signed by NIWRUTTI BHAGUJI MARALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=NIWRUTTI BHAGUJI MARALE
Date: 2024.07.29 15:00:09 +05'30'

**( नि. भा. मराळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व जिल्हाधिकारी
४. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे.
५. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, नागपूर
७. व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे
८. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन.
९. मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
१०. उपायुक्त पशुसंवर्धन (पशुधन व कुक्कुट)
११. उपायुक्त पशुसंवर्धन, पशुप्रजनन
१२. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त.
१३. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद.
१४. सहायक आयुक्त पशुसंवर्धन, जिल्हा पशुवैद्यकीय सर्वचिकित्सालय
१५. अवर सचिव (पदुम -३), कक्ष अधिकारी (पदुम १, २ व १६) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती (पदुम-४).